राज्य शासनाच्या निवृत्तीवेतनधारकांना
हयातीचा दाखला सादर करण्यास
मुदतवाढ देणेबाबत.....

# महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१२६/२१/कोषा-प्रशा५**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक: ९ डिसेंबर, २०२१.**

वाचा- १)वित्त विभाग, शासन निर्णय क्र. निवेयो ०११७/प्र.क्र.१२०/ कोषा प्रशा ५ दि. १८ ऑगस्ट, २००८.
२) केंद्र शासनाचे ज्ञापन क्र.१८/१/२०२०-P & PW (H)-III-६७८६, दि. १ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८ च्या नियम ३३५ व संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार निवृत्तीवेतन धारकांना दरवर्षी दि. १ नोव्हेंबर रोजीचा हयातीचा दाखला, दि. १ नोव्हेंबर पासून दि. ३० नोव्हेंबर पर्यंत निवृत्तीवेतन संवितरण प्राधिकाऱ्यास सादर करावा लागतो. सदर हयातीचा दाखला मुख्यत: संबंधित निवृत्तीवेतनधारक ज्या बँकेतून निवृत्तीवेतन घेतात त्या बँकेमार्फत संबंधित कोषागारात सादर केला जातो.

सद्यस्थितीत सुरू असलेल्या कोविड १९ साथीच्या आजाराच्या पार्श्वभूमीवर आणि ज्येष्ठ नागरिकांना असलेली कोरोना विषाणूची असुरक्षितता विचारात घेऊन, केंद्र शासनाने सर्व वयोगटातील निवृत्तीवेतनधारकांसाठी जीवन प्रमाणपत्र सादर करण्यास मुदतवाढ दिलेली आहे. त्याच धर्तीवर राज्य शासकीय निवृत्तीवेतन धारकांनाही हयातीचा दाखला सादर करण्यास मुदतवाढ देण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन परिपत्रक**

१. राज्य शासकीय निवृत्तीवेतनधारकांना हयातीचा दाखला सादर करण्यास दि. ३१ डिसेंबर, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.
२. हे आदेश अनुदान प्राप्त शैक्षणिक संस्था, कृषितर विद्यापीठे व त्यांच्याशी संलग्न असलेली अशासकीय महाविद्यालये व कृषी विद्यापीठे आणि जिल्हा परिषदांचे निवृत्तीवेतनधारक यांनाही लागू राहतील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२११२०९११५७३९८००५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

INDRAJEET SAMBHAJI GORE

Digitally signed by INDRAJEET SAMBHAJI GORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6015944fe7d58a83f4a54c43147b5da1e34861e2984e9f793b66f7249aaa9c1a, pseudonym=CAD826A943AA15444490C64866C7EE464C4AD05A, serialNumber=D4994742192306FCC1DEA9AADD3810639506519FA652B919767B98B04E905A18, cn=INDRAJEET SAMBHAJI GORE
Date: 2021.12.09 11:58:53 +05'30'

( इंद्रजित गोरे )
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१.मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२.सर्व मा.विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य,
३.मा.राज्यपाल यांचे सचिव
४.मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
५.मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
५.सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
६.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
७.सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या अधिन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख
८.प्रबंधक, मुळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
९.प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
१०.प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३.आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई ४००००२
१४.आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर ४४४००१
१५.प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१६.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१७.सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई
१८.प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१९.प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२०. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२१.विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२२.सर्व विभागीय आयुक्त

२३.सर्व जिल्हाधिकारी

२४.सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

२५.संचालक , लेखा व कोषागारे, मुंबई

२६.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२७.सहसंचालक,लेखा व कोषागारे,कोकण/पुणे / नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर

२८.संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई

२९.सहसंचालक,स्थानिक निधी लेखापरीक्षा कोकण/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर

३०.वित्त विभागातील सर्व कार्यासने

३१.निवड नस्ती कोषा प्रशा.५